भ्रष्टाचार प्रतिबंधक अधिनियम १९८८ अंतर्गत अभियोग दाखल करण्यास विहित कालावधीत मंजुरी देणे तसेच गट अ व गट ब मधील राजपत्रित अधिकारी यांच्या बाबतीत प्रशासकीय विभागाच्या अधिपत्याखालील अधिकाऱ्यांकरिता निलंबन आढावा समितीचे गठन करणे.

महाराष्ट्र शासन
महसूल विभाग
शासन निर्णय क्रमांकः- निप्रआ -२०१५/ प्र.क्र.१०५/म-१
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक :- २४ जुलै, २०१७

वाचा -

१) शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक निप्रआ -१११९/प्र.क्र.८६/११अ, दि. १४/१०/२०११
२) शासन निर्णय क्रमांक : सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक अभियो - १३१२/प्र.क्र. ३०/पुर्नबांधीत-१ , दि. १२/२/२०१३
३) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक अभियो - १३१४/प्र.क्र. ८६/११अ, दि. ३१/१/२०१५

प्रस्तावना -

महाराष्ट्र नागरी सेवा (शिस्त व अपील) नियम १९७९ च्या नियम ४ मधील पोटनियम (५) खालील खंड (क) मधील परंतुकानुसार शासकीय कर्मचा-यांवर फौजदारी गुन्हा दाखल करण्यात आल्यामुळे निलंबित करण्यात आले असेल तर अशा प्रकरणांमध्ये निलंबित कर्मचा-यांच्या निलंबन आदेशात फेरबदल करण्यापुर्वी वा तो रद्द करण्यापूर्वी शासनाने या प्रयोजनार्थ गठित केलेल्या निलंबन आढावा समितीची शिफारस प्राप्त करुन घ्यावी, अशी तरतुद विहित करण्यात आली आहे. या तरतुदीच्या अनुषंगाने संदर्भ क्र.१ वरील सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय दिनांक १४.१०.२०११ अन्वये गट- अ व गट - ब मधील कर्मचा-यासाठी मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली “निलंबन आढावा समिती” गठित करण्यात आली होती.

उक्त शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, दि. १४/१०/२०११ मधील २ (i) येथील मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखालील समितीऐवजी संबधित प्रशासकीय विभागाच्या अ.मु.स./ प्र.स./ सचिव यांच्या अध्यक्षतेखाली त्या त्या प्रशासकीय विभागाच्या अखत्यारीतील गट-अ व गट-ब मधील अधिका-यांच्या निलंबन विषयक प्रकरणांचा आढावा घेण्याबाबत मंत्रालयीन

प्रशासकीय विभागांनी त्यांचे स्तरावर "निलंबन आढावा समिती" समिती गठित करण्यात यावी अशा सुचना संदर्भाधिन क्रमांक ३ येथे नमुद शासन निर्णयान्वये देण्यात आलेल्या आहेत. त्याअनुषंगाने खालीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय :-**

संदर्भ क्र.३ वरील शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, दिनांक ३१.०१.२०१५ मधील निर्देशाच्या अनुषंगाने महसूल विभागाच्या अ.मु.स/प्र.स./सचिव यांच्या अध्यक्षतेखाली महसूल विभागाच्या अंतर्गत नोंदणी महानिरीक्षक व मुद्रांक नियंत्रक, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्या अधिपत्याखालील गट-अ व गट-ब संवर्गातील राजपत्रित अधिकांऱ्याचे निलंबन विषयक प्रकरणांचा आढावा घेण्याबाबत खालीलप्रमाणे "निलंबन आढावा समिती" गठित करण्यात येत आहे:-

**गट-अ व गट-ब अधिकाऱ्यांबाबत प्रशासकीय विभाग स्तरावरील निलंबन आढावा समिती**

१. अप्पर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव ... अध्यक्ष

२. अतिरिक्त पोलिस महासंचालक, लाचलूचपत प्रतिबंधक विभाग .... सदस्य

३. सह सचिव/उप सचिव, (गृह विभाग) ... सदस्य

४. सह सचिव/उप सचिव, (महसूल विभाग) (म-१) ... सदस्य सचिव

२. या समितीने उक्त शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग, दिनांक ३१.१.२०१५ मधील परिच्छेद-५ मधील कार्यपध्दतीचे पालन करुन गट-अ व गट-ब संवर्गातील निलंबित अधिकाऱ्यांच्या प्रकरणांचा आढावा घ्यावा आणि निलंबन करण्यास अथवा मागे घेण्यास सक्षम प्राधिकारी यांना सदर समितीने आपल्या शिफारशी सादर कराव्यात.

३. क्षेत्रिय स्तरावरील गट-क व गट-ड मधील कर्मचाऱ्यांबाबत अभियोग दाखल करावयाच्या प्रलंबित प्रकरणाचा उपरोक्त नमूद समितीने, वेळोवेळी आढावा घ्यावा व त्यासंदर्भातील अहवाल मुख्य सचिव तसेच अपर मुख्य सचिव, गृह विभाग यांना पाठविण्यात यावा.

४. वरील सुधारणांव्यतिरिक्त संदर्भ क्र.२ वरील शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, दिनांक १२.०२.२०१३ मधील अन्य तरतुदीमध्ये कोणताही बदल करण्यात आलेला नाही, त्या तरतुदी तशाच लागू राहतील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०७२४१६१५१९६११९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

A. P. Shingade

Digitally signed by A. P. Shingade
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue and Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=0619305c0a0825664efa457ffa51c3f2364841c81f8c437078a333b7111446a2, cn=A. P. Shingade
Date: 2017.07.28 15:20:17 +05'30'

**(अं. पां. शिंगाडे)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा. राज्यपालांचे सचिव
२. मा. मुख्य मंत्री यांचे प्रधान सचिव
३. मा. मंत्री (महसुल) यांचे खाजगी सचिव
४. मा. राज्यमंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव
५. शासनाचे मुख्य सचिव यांचे स्वीय सहायक
६. अपर मुख्य सचिव (गृह) यांचे स्वीय सहायक
७. अप्पर मुख्य सचिव (सेवा) सामान्य प्रशासन विभाग, यांचे स्वीय सहायक,
८. प्रधान सचिव (महसूल,मुद्रांक शुल्क व नोंदणी) यांचे स्वीय सहायक
९. महासंचालक, लाचलुचपत प्रतिबंधक विभाग, वरळी, मुंबई
१०.नोंदणी महानिरीक्षक व मुद्रांक नियंत्रक, महाराष्ट्र राज्य, पुणे
११.निवड नस्ती (म-१)